संक्षिप्त

# मेघदूत

## महाकवि – कालिदास – विरचित-
## ‘ मेघदूतम्’ चा
## स्वैर , संक्षिप्त , मराठी पद्यानुवाद



*कुठे मेघ तो मिश्रण केवळ तेज-धूर-जल-वायूचे*
*पोचविणे संदेश कुठे ते काम सचेतन जीवांचे ।*
*अजीव आणिक सजीव भेदे भान तया नाही उरले*
*जाणुनि ध्यावे आर्त मनोगत कामी विरही यक्षाचे ।।*

## संक्षिप्त मेघदूत


- गीतकार —— राजेन्द्र दातार

संस्कृत – प्रबोधिनी, १०१ /A, साई-श्रद्धा,
तलाठी-कार्यालयाजवळ, कुळगाव-बदलापूर,
PIN ४२१५०३ दूरभाष – ९४२१६२६८१४


- ( केवळ खासगी वितरणासाठी )
- मूल्य → १० रु.

---

- **गीतात वापरलेली वृत्ते —**

| श्लोक क्र. | वृत्त | श्लोक क्र. | वृत्त | श्लोक क्र. | वृत्त | श्लोक क्र. | वृत्त |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | साकी | ११ | साकी | २१ | चंद्र. | ३१ | सूर्य. |
| २ | साकी | १२ | सूर्य. | २२ | साकी | ३२ | सूर्य. |
| ३ | साकी | १३ | साकी | २३ | साकी | ३३ | साकी |
| ४ | साकी | १४ | सूर्य. | २४ | चंद्र. | ३४ | साकी |
| ५ | चंद्र. | १५ | साकी | २५ | सूर्य. | ३५ | साकी |
| ६ | साकी | १६ | साकी | २६ | साकी | ३६ | साकी |
| ७ | सूर्य. | १७ | सूर्य. | २७ | सूर्य. | ३७ | हरि. |
| ८ | सूर्य. | १८ | सूर्य. | २८ | साकी | ३८ | हरि. |
| ९ | सूर्य. | १९ | साकी | २९ | सूर्य. | ३९ | हरि. |
| १० | साकी | २० | साकी | ३० | साकी | ४० | सूर्य. |

**चंद्रकांत → ८/८/८/२**  **सूर्यकांत → ८/८/८/३**
**साकी → ८/८/८/४**  **हरिभगिनी → ८/८/८/६**

# संक्षिप्त मेघदूत

( महाकवि – कालिदास – विरचित- ‘ मेघदूतम्’ चा
स्वैर , संक्षिप्त , मराठी पद्यानुवाद )

(पूर्वमेघ)

( १ )

रामगिरीवर विरही शापित यक्ष थांबला एक
दिसे तयाला कड्यास भिडतो कृष्णसावळा मेघ
फुले कुड्याची उधळुनि बोले तूच दूत रे खास
आषाढाच्या पहिल्या दिवशी यक्ष वदे मेघास

( २ )

मेघराज तू कामरूप तू जलद दूत रे थोर
तुझ्या दर्शने प्रेमिजनांच्या मनी नाचतो मोर
कांता माझी असेल तिकडे करीत बसली घोर
वार्ता माझी कळता येइल तिला जरासा जोर

( ३ )

यक्ष-राजधानी सुंदर ती अलकापुरी प्रसिद्ध
तेथलाच मी, यक्ष-राज तो माझा धनी कुबेर
कुबेर-कोपे वर्षभराच्या शापे इथेच बद्ध
असेल अलकेमध्ये कांता मम विरहाने दग्ध

( ४ )

इंद्रधनूषी रत्नहार तव श्यामल कांतीवरचा
दिसे जणू की मयूरपंखी मुकुट घनश्यामाचा
पहा पोळली तृषार्त भूमी तृषार्त झाले सर्व
माझ्यासम रे विरहार्तांना सख्या तूच आधार

( ५ )

शिदोरीस घेऊन कोवळे कमळाचे कोंब
मानसमार्गी राजहंस ते तुला सोबतीस
चातक बोले गोड, मंदसा पवनहि अनुकूल
रामपदासी मिठी मारुनी व्हावे मार्गस्थ

( ६ )

मार्ग तुझा रे उत्तरेकडे ऐक सांगतो पत्ता
वाटेवरल्या खुणा सांगतो ऐकुनि घे मम चित्ता
जनकल्याणे बरसत जावे रोड जरासे व्हावे
झऱ्याझऱ्यांचे पिऊन पाणी पुन्हा पुष्टही व्हावे

( ७ )

पठारावरी चढून जावे जरा पश्चिमेकडे
पाहशील तू नांगरलेली मृद्गंधित खाचरे
पुढे उत्तरेकडे चालता सिद्ध तुझ्या स्वागता
आम्रकूट तो सखा आठवी तुला दाहशामका

( ८ )

आम्रकूट पर्वतावरूनी जेव्हा तू चालशी
आमराइ उजळल्या डोंगरावरती रेंगाळसी
पांडुरवर्णी डोंगरमाथा भू-मातेचा स्तन
स्तनाग्रापरी तुला पाहतिल दिव्यरथी सुरगण

( ९ )

देउनि जीवन वनवासींना जलदगती होउनी
मार्गक्रमणे ऐकत जावे मयूर-केकावली
पहा नर्मदा फांदरलेली विंध्यपदी कातळी
गजांगावरी शृंगाराची नक्षी जणु रेखली

( १० )

दशार्णदेशी पांडुरलेले घायपात वरवंडे
कदंब फुलले, डुलती केळी, रस्ते जांभुळलेले
वेत्रवतीच्या तीरी विदिशा पहा राजधानी ती
विश्रांती घे प्रणयगंधिल्या निकट पर्वतावरती

( ११ )

जरा वाकडी वाट करूनी अवंतिदेशा जावे
स्वर्गाच्या तुकड्यास जणू त्या उज्जयिनीस पहावे
होती अभिसारिका उह्लसित गंधित शिप्रावाते
सौधांवरच्या केशधुपाने तूही ऊर्जित व्हावे

( १२)

गंधवतीच्या जळात न्हाती तरुणी लावुनि उटी
घेउनि परिमळ पवन वाहतो चण्डीश्वर-मंदिरी
वाजव संध्यार्चनी चौघडा चवऱ्या ढाळति गणिका
थकल्या परि तव तुषार मिळता प्रेमे बघतिल तुला

( १३)

पहा काननी उंच वृक्ष ते जणू शिवाचे बाहू
लपेट संध्यारुण तू , विसरे गजचर्माला शंभू
उमा कौतुके पाहिल तुजला, पुढे रतींना रात्री
मार्ग दाखवुनि कर एखाद्या माडीवरती वस्ती

(१४)

हृदयामध्ये तुला साठवी पहा गभीरा नदी
मासोळींच्या उड्या जणू की तिची नेत्रपल्लवी
कटीतटीचे नीर सरकते कर-वेते नावरे
नार अनावृत जरी मोहवी तिच्यात गुंतू नये

( १५)

पुढे चलावे देवगिरीवर जिथे राहतो स्कंद
तेज शिवाचे अग्निमुखातिल कार्तिकेय सुकुमार
सुमनसरींनी पूज तयाला, नृत्य करील मयूर
पहा पुढे चंबळा ऐकवी रन्तिदेव-आख्यान

( १६ )

चंबळपात्री जलप्राशना वाकशील तू जेव्हा
इंद्रनील मुक्तावलिमधला भासशील सिद्धांना
पुढे नगर दशपूर, त्यापुढे ब्रह्मावर्त सुदेश
देत सावली पुढे चालता कुरुक्षेत्र बघशील

( १७ )

पार्थाने पाडली मस्तके तिथे धडाधड जशी
मुसळधार वर्षाव करावा तसा तूहि त्या रणी
बलरामाची मद्यमुक्तिदा सरस्वती बघ पुढे
कृष्ण जरी तू चित्तशुद्धिकर तोय तिचे सेव रे

( १८ )

कनखलभागी भागीरथिला भिडून जावे पुढे
तुझी सावली तिच्यात भासे यमुना जणु संगमे
सगराच्या पुत्रांना स्वर्गद गंगा ती जाह्नवी
हसुनि उमेच्या मुखवलयांना जटा हराच्या धरी

( १९ )

पहा पहाडी शिवपदमुद्रा प्रदक्षिणा कर, मार्गी
दिसता वणवा विझव झडकरी, नाद घुमव खिंडारी
किन्नरिगाने साथ करूनी, घ्यावा कस्तुरिगंध
शुभ्र स्फटिकी रम्य हिमालय चढून जावे पार

( २० )

क्रौंचगिरीच्या खिंडारातुनि तिरके होउन जावे
पुढे पाहता कैलासासी मस्तक ही नमवावे
घनीभूत होउनी उमेच्या पाउलास झेलावे
जरा पुढे ती दिसेल अलका, विसावून तू घ्यावे

(उत्तरमेघ) (२१)

भालचंद्र सहवासे पावन चैत्ररथोद्यान
तया बिलगुनी चमके अलका शुभ्र चांदण्यात
कुबेर-कीर्ती किन्नर गाती चैत्ररथोद्याने
पहा विलासी लोक अप्सरांसवे रंगलेले

(२२)

भांगांमध्ये कदंब ज्यांच्या कानांवरी शिरीष
कोरांटी खोवली कुंतली, कुंदकळ्यांचे चाप
लोध्रपरागी मुखलेपाने मुखे जाहली गौर
हाती कमले विलासिनींच्या पाहशील अलकेत

(२३)

पाहशील तू रत्नभूम ते सुंदर रंगमहाल
पहा मनोहर देखावे ही, तरुणी त्या नखरेल
नीरगाठ सोडता प्रियकरे लाजुनि होती चूर
विझतील कसे गुलाल फेकुनि रत्नमण्यांचे दीप

(२४)
नित्यतरुण यक्षांचे अश्रू केवळ हर्षाचे
चंद्रहास खड्गाचे व्रणही अलंकार त्यांचे
समागमे जो शांत होतसे मदनज्वर मात्र
प्रेमाच्या कलहाने केवळ विरहतात यक्ष
(२५)
पाहशील तू यक्षकन्यका गंगातीरावर
सोनेरी वाळूत बैसती रत्नमणी खेळत
प्रासादाच्या सौधांवरती मृदंगतालावर
यक्ष सेवती रतिफळ-मदिरा कल्पवृक्षनिर्मित
(२६)
कल्पवृक्ष एकटा देतसे सर्वहि वनिता-साज
नयनोन्मादक मद्य, भूषणे, वस्त्रेही पदराग
भ्रमराक्षींचे कटाक्ष मोहक, मदनाचे ना काम
चतुर कामिनी अलकेमध्ये करिती भोग-विलास
(२७)
उत्तररात्री अभ्रे सरता, चंद्रकिरण वर्षता
चंद्रकान्त पाझरता जाई रमणींचा शिणवटा
रस्त्यांवरती गजरे, मोती सकाळीच पाहता
कळे कोणत्या मार्गे गेल्या रात्री अभिसारिका

(२८)

सदापुष्प ते वृक्ष डोलती भ्रमरकलित नित्य
सदापद्म त्या पुष्करिणीही हंसावलि-कटिबद्ध
चपळ हरितही अश्व पहा तू पहा मत्त ते हत्ती
प्रचंड वाडा सम्राटाचा खिळवुन ठेविल दृष्टी

(२९)

राजगृहाच्या उत्तरेकडे दिसेल माझे घर
प्राकारावर कमान सुंदर इंद्रधनुष्यासम
प्रवेशदारी फुले सानुला मंदाराचा रुख
स्फटिकपट्टिका मोरासाठी सुवर्णकांबीवर

( ३०)

क्रीडापर्वत नीलमण्यांचा पुढे सोनकेळी त्या
जणू सावळ्या तुझ्या कडेला चमके विद्युन्माला
पाचूचा सोपान बांधला पहा थोरली वाप
स्वच्छ जीवनी डुलती कमळे, हंसहि ते संतुष्ट

( ३१)

मम वामेच्या वामपदाचे अशोकास डोहळे
मदिर चूळही बकुळ इच्छितो पहा अंगणी पुढे
दारी तोरण उंबऱ्यापुढे शंख, पद्म अंकने
सख्या समज तू उभा ठाकला माझ्या सदनापुढे

( ३२)

तनू सावळी, कुरंगनयना, सुंदर दंतावली,
लालचुटुक ते ओठ जणू की पिकलेली तोंडली
उरोजभारे जरा वाकते, चाल गजासारखी
परंतु आता रोड जाहली असेल माझी सखी

( ३३)

केस मोकळे, डोळे रडवे, मरगळला मुखचंद्र
हातावर ठेवून हनुवटी बसली असेल खिन्न
तारा छेडित बसली किंवा मज दुबळ्यास चितारी
मलीनवस्त्रा भूषणरहिता दिसेल कांता माझी

(३४)

दिवस फुलांनी उंबऱ्यावरी मोजित बसली किंवा
'आठवतो का धनी ?' सारिके संगे बोलत किंवा
पूजेमध्ये गर्क होतसे , स्फुरेल डावा डोळा
व्याकुळ रंभा शुभशकुनाने चिंतिल माझी वार्ता

(३५ )

दिवस तिचा घरकामामध्ये जात असेल कसाही
परंतु रात्री आठवणींनी झोप नसेल तिलाही
थकूनिया ती जरी झोपली पाहिल मजला स्वप्नी
गडगडू नको, जरा थांब तू सुहृदा प्रहरासाठी

(३६)

रामप्रहरी तुषार हलके शिंपड खिडकीपाशी
खुलता जाई, मंद दरवळे, वळेल तुजवर दृष्टी
जरा चमकुनी, गडगड करुनी, लक्ष वेधुनी घ्यावे
नम्रपणे त्या मानिनीपुढे भाषण आरंभावे

(३७)

मेघदूत मी तुझ्या पतीचा, निरोप त्याचा ऐकुन घे
कुशल असे तो तुझे कुशलही ऐकण्यास आतुर आहे
विरही, कष्टी, तुला चितारी, धैर्यवान तो सांगतसे
सुखदु:खाचे भोग जीवनी चक्राच्या धावेपरि ते

(३८)

वाट पाहणे केवळ आता चार महीने, धीर धरी
पुनवेला ह्या कार्तिकातल्या पाहशील तू मला घरी
मदिरयामिनी सुरतक्रीड़ा भोग जीवनी भोगू या
निरोप माझ्या पत्नीला हा नीटपणे तू सांगावा

(३९)

शंकित होउनि तीही तुजवर जरी न ठेविल विश्वास
तुला सांगतो ऐकव तिजला दोघांमधली ही गोष्ट
एके रात्री दचके कांता, विचारता बोले काय
दुज्या कोणत्या रमणीसंगे दिसला राया स्वप्नात

(४०)

**पवनसख्या विश्वास करिल ती खूणगोष्ट ऐकता**
**पवनसुतावर जशी जानकी अंगठीस पाहता**
**फिरूनि यावे कुशल तिचेही सत्वर घेऊनिया**
**गीत मनीचे मेघदूत हे ऐकलेस ना सख्या**



## टिपा —

श्लोक क्र.१ : **रामगिरी** - नागपूरजवळील रामटेकचा डोंगर.

श्लोक क्र.२ : **कामरूप** - कामनेप्रमाणे म्हणजे इच्छेप्रमाणे रूप धारण करणारा.

श्लोक क्र. ११ : **शिप्रावात** - शिप्रानदीवरून वाहत येणारा वारा.

श्लोक क्र. १२ : **गंधवती** - नदीचे नाव ( उज्जैनजवळ )

**चण्डीश्वर**-महाकालेश्वराचेच नाव (उज्जैन येथे) पूर्वी मंदिरात चवऱ्या ढाळायला गणिका असत.

श्लोक क्र. १३ : **संध्यारुण** -संध्याकाळच्या प्रकाशामुळे अरुण म्हणजेच लालसर वर्ण असलेला.

**गजचर्म** - गजासुराचे रक्ताळलेले चर्म त्याच्या इच्छेनुसार शंकराने धारण केले होते.

श्लोक क्र. १४ : **रन्तिदेव आख्यान** – रन्तिदेव राजाने यज्ञासाठी पुष्कळ गायींची कत्तल केली व त्यामुळे रक्ताचे पाट वाहून नदी लाल रंगाची झाली, अशी आख्यायिका आहे. ती नदी म्हणजेच चर्मण्वती म्हणजेच आजची चंबळा.

श्लोक क्र. १६ : लांबून पाहिले असता चंबळचे पात्र हे मोत्यांच्या हाराप्रमाणे भासेल. **सिद्धांना** – सिद्ध पुरुषांना, सिद्धीद्वारे आकाशातून भ्रमण करणाऱ्यांना.

श्लोक क्र. १७ : महाभारत युद्धानंतर उद्विग्न बलरामाची सरस्वतीजलाने चित्तशुद्धी झाली व मद्याची सवय त्याने निग्रहपूर्वक सोडली.

श्लोक क्र. १८ : **कनखल** - भागाचे, नगराचे नांव (उत्तरांचल मध्ये).

**शिवपदमुद्रा**–हरिद्वाराजवळील 'हर की पाँवरी' शंकराच्या पायाचा कातळावर उमटलेला ठसा.

श्लोक क्र. २० : **क्रौंचगिरीचे खिंडार** - प्रथम कार्तिकेयाने एक व म्हणून नंतर परशुरामाने दुसरा असे क्रौंच पर्वताला आरपार बोगदे पाडले.

श्लोक क्र. २४ : **चंद्रहास** - हे रावणाच्या तलवारीचे नांव. रावणाने कुबेरावर स्वारी केली तेव्हा रावणाशी लढताना यक्ष जखमी झाले.

श्लोक क्र. २७ : चंद्रकिरणामुळे चंद्रकांत मण्याला पाझर फुटतो असे म्हणतात. - म्हणजे तसा भास होत असावा.

श्लोक क्र. ३१ : स्त्रीने डाव्या पायाने लाथ मारली म्हणजे अशोक वृक्ष फुलतो व स्त्रीने मद्याची चूळ बकुळवृक्षावर टाकल्यास तो अधिकच बहरतो, असे म्हणतात. (आयुर्वेदातही असे उल्लेख आहेत.)

——×——

संस्कृताभ्यासार्थम् उपयुक्तानि राजेन्द्रदातार-लिखितानि पुस्तकानि

---

## धात्वङ्गमञ्जरी ( 1 ) ( ₹ 100 )

प्रथम-गणसमूहस्थानां (1, 4, 6, 10) धातूनां सार्वधातुक-कालार्थ-रूपाणि साधयितुं सुसूत्रं विवेचनम्। प्रथम-गणसमूहस्थानां सर्वेषां धातूनां (प्रायः 1900) वर्गीकरणेन सह समग्रा सूचिः। अनुमित्या 550 धातवः आङ्ग्लमराठीभाषार्थेन सह कर्मणि लट्रूपैः सह च प्रदत्ताः। पश्चावरणे संस्कृत-वर्णसाधना-सरणिः। सर्वं विवेचनं संस्कृतेन।

## धात्वङ्गमञ्जरी ( 2 ) ( ₹ 150 )

द्वितीय-गणसमूहस्थाः (2, 3, 5, 7, 8, 9) सर्वे धातवः तेषाम् आङ्ग्लमराठीभाषार्थेन सह कर्मणि लट्रूपैः सह च प्रदत्ताः। पित्-अपित्-प्रत्यययोगेन तेषां सार्वधातुक-कालार्थ-रूपाणि साधयितुं सुसूत्रं विवेचनम्। विशेषपद्धत्या द्वितीय-गणसमूहस्थानां सर्वधातूनां वर्गीकरणम्। पश्चावरणे कालार्थ-प्रत्यय-सरणिः। सर्वं विवेचनं संस्कृतेन।

## सर्वादीनि सर्वनामानि ( ₹ 40 )

सर्वादिगणस्थानां 35 प्रातिपदिकानां सुबन्तानि तथा च तद्विषये महत्त्वपूर्णाः टिप्पण्यः l Explained in English.

## वानसनामावली Names of Plants ( ₹ 20 )

( English - Marathi – Saḿskṛta - Botanical )

---

| | |
|---|---|
| **संजीवन-तत्त्व-संकलन** | ( ₹ 45 ) |
| **मेघदूतम्** ( स्वैर, संक्षिप्त, मराठी पद्यानुवाद ) | ( ₹ 20 ) |
| **श्रीरामरक्षास्तोत्रम्** ( सपदच्छेदान्वयार्थम् ) | ( ₹ 20 ) |
| **श्रीप्रज्ञावर्धनस्तोत्र** ( सपदच्छेदान्वयार्थम् ) | **( ₹ 20 )** |
| **श्रीहरिपाठः** | ( ₹ 60 ) |
| ( संत ज्ञानेश्वरांचा हरिपाठ, त्याचा संस्कृतानुवाद, पसायदान / अठरा श्लोकी गीता - मराठी व संस्कृत ) | |
| **नवनीतम्** | **(आगामि )** |
| ( संस्कृत-काव्यरचना-सङ्ग्रहः, वृत्तबोधसमेतम् ) | |


संस्कृत – प्रबोधिनी, 101 A,साई-श्रद्धा,
तलाठी-कार्यालयाजवळ, कुळगाव-बदलापूर, जि.ठाणे,
PIN 421503
दूरभाष – 9421626814